महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम संहिता (१९८४) मधील परिच्छेद क्र.१४२ प्रमाणे कामाची अंदाजपत्रके तयार करतांना विचारात घ्यावयाच्या बाबी (वहन अंतर)

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन आदेश क्र. संकीर्ण २०१०/(५७०/२०१०)/मोप्र-२**
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२,
दिनांक- १७/०१/२०१५

**वाचा:-** १) शासन परिपत्रक, पाटबंधारे विभाग, क्र. संकिर्ण १०९८/(९६/९८)/मो.प्र (प्र.) दिनांक ४/९/२०००
२) शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्र. संकिर्ण २००९/(४६५/२००९)/ मोप्र-२ दिनांक १५/०१/२०१०
३) शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्र. संकिर्ण २०१०/(५७०/२०१०)/ मोप्र-२ दिनांक २०/१०/२०१०

**पूर्वपिठीका -**

जलसंपदा प्रकल्पाच्या कामांची प्राक्कलने / सुधारित प्रशासकीय मान्यतेची प्राक्कलने तयार करतांना वहन अंतर, अन्वेषण, संकल्पचित्रातील बदल, व्याप्तीतील बदल व इतर बाबी याबाबत कशी कार्यवाही करावी यांच्या सूचना महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम संहिता(१९८४ ) मधील परिच्छेद क्रमांक १४२ मध्ये कामांची अंदाजपत्रके तयार करतांना विचारात घ्यावयाच्या बाबी विहित करण्यात आल्या आहेत. तसेच या विभागाचे संदर्भित शासन परिपत्रके अन्वये प्रकल्पांच्या कामांची प्राक्कलने/सुधारित प्रशासकीय मान्यतेची प्राक्कलने तयार करतांना विचारात घ्यावयाच्या बाबी क्षेत्रिय अधिका-यांच्या निदर्शनास आणून देण्यात आलेल्या आहेत.

२. संदर्भित क्र. १ च्या शासन परिपत्रकान्वये साहित्यसामग्री / पाणी यांच्या उपलब्धतेच्या ठिकाणापासून कामाच्या क्षेत्रिय स्थळापर्यंत असलेले अंतर याची निश्चिती प्रत्यक्ष अंतर मोजून करण्यात यावी त्यांची शहानिशा उपअभियंता पदाच्या अधिका-याने अथवा त्यावरील पदाच्या अधिका-याने करावी व तसे संबंधित अधिका-यांचे प्रमाणपत्र अंदाजपत्रकासोबत जोडण्यात यावे. कोणत्याही कारणासाठी / बाबींसाठी वहन अंतर कार्यकारी अभियंता स्तरावर एक किलोमीटरपर्यंत, अधीक्षक अभियंता स्तरावर दोन किलोमीटर पर्यंत व त्यापेक्षा जास्त अंतर असल्यास मुख्य अभियंता स्तरावर पूर्व मान्यता घेतलेली असणे जरुरीचे आहे. चालू कामाच्या अंदाजपत्रकातील दर व दर विश्लेषणपण याप्रमाणे कार्यकारी अभियंतांनी तपासून घेणे व आवश्यक तेथे दुरुस्त करणे व त्याला सक्षम अधिकारी स्तरावर मान्यता घेणे आवश्यक आहे. होणा-या संभाव्य अतिप्रदानाची जबाबदारी त्यांच्यावर राहिल अशी स्पष्ट ताकीद देण्यात आली होती.

३. मुख्य अभियंता यांच्या दि.१५ व १६ जुलै,२०११ रोजी नाशिक येथे संपन्न झालेल्या परिषदेमध्ये वरील परिच्छेदात नमूद केलेल्या वहन अंतर मोजण्याबाबत अडचणी मांडण्यात आल्या होत्या.

मुख्य अभियंता परिषदेमध्ये याबाबत शिफारस करण्यात आली होती. तदनंतर जलसंपदा विभागाचे व्हिजन २०२० वर चर्चा करण्यासाठी वाल्मी येथे दि. २८/६/२०१३ रोजी आयोजित करण्यात आलेल्या कार्यशाळेमध्ये राज्यातील सर्व वरिष्ठ अधिकाऱ्यांनी पुनश्चः १५ व १६ जुलै, २०११ रोजी झालेल्या मुख्य अभियंता परिषदेतील साहित्याचे वहन अंतर मंजूर करण्याच्या अधिकाराबाबत विकेंद्रीकरणाची शिफारस मान्य करावी, असे प्रतिपादन केले. अभियंत्यांमध्ये जबाबदारपणा, सक्षमता व गुणवत्ता वाढीस लागण्यासाठी अधिकाराचे विकेंद्रीकरण आवश्यक आहे, अशी शिफारस करण्यात आली होती. मागील काही वर्षामध्ये क्षेत्रीय परिस्थितीनुसार क्षेत्रीय स्तरावर निर्णय घेणे अपेक्षित असताना अधिकारांचे केंद्रीकरण झाले असल्यामुळे क्षेत्रीय स्तरावर दैनंदिन अडचणी येत आहेत. सर्वसाधारण बांधकाम साहित्यांची उपलब्धता उदा. माती, मुरुम, वाळू, खडी, दगड इत्यादी दोन किलोमीटरपेक्षा जास्त अंतरावर उपलब्ध होत असल्यामुळे कमी किंमतीचे अंदाजपत्रक सुद्धा कार्यकारी अभियंता यांच्या अधिकारात असले तरी मुख्य अभियंता यांची वहन अंतरास मान्यता मिळाल्यानंतरच अंदाजपत्रकास मान्यता देणे शक्य होते. त्यामुळे अंदाजपत्रकास मान्यता व प्रत्यक्ष काम करण्यास विलंब होत असल्याचे निदर्शनास आले. आता राज्यामध्ये एआयबीपी, नाबार्ड, लाक्षेवि तसेच आरआरआर या सारख्या केंद्र शासनाच्या सहाय्याने घेण्यात येणाऱ्या प्रकल्पाच्या अंमलबजावणी करण्यामध्येपण अडचणी येत आहेत. त्याचप्रमाणे सिंचन व्यवस्थापनामध्ये कालवा देखभाल दुरुस्तीच्या अंदाजपत्रकास मान्यता, वहन अंतरास मुख्य अभियंत्याची पूर्व मान्यता मिळाल्याशिवाय देणे शक्य होत नाही. या सर्व अडचणीचा विचार करुन तसेच राज्य शासनाचे अधिकारांचे विकेंद्रीकरण करण्याच्या धोरणास अनुसरुन बांधकाम साहित्याचे वहन अंतर मंजूर करण्याचे अधिकाराबाबत खालीलप्रमाणे निर्देश देण्यात येत आहे.

**शासनाचे निर्देश:-**

जलसंपदा विभागाकडील कामांसाठी बांधकाम साहित्याचे वहन अंतर मंजूर करण्याचे अधिकारा खालीलप्रमाणे देण्यात येत आहेत.

**(अ) माती व मुरुम कामे**

१) कार्यकारी अभियंता- ५ कि.मी. पर्यन्त

२) अधीक्षक अभियंता- पूर्ण अधिकार

**(ब) इतर बांधकाम साहित्य**

१) कार्यकारी अभियंता- २५ कि.मी. पर्यन्त

२) अधीक्षक अभियंता- पूर्ण अधिकार

वरीलप्रमाणे वहन अंतरास मान्यता देणाऱ्या अधिकाऱ्याने खदानीपासूनची वहन अंतर तपासणी सक्षम स्तरावर झाली असल्याचे तसेच खदानी मधील बांधकाम साहित्य इत्यादींची चाचणी घेवून सदरील साहित्य बांधकामासाठी योग्य असल्याचे गुणनियंत्रण विभागाचे प्रमाणपत्राची पूर्तता झाली आहे, याची खात्री करुनच वहन अंतरास मान्यता द्यावी.

अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता देण्यास सक्षम असलेल्या अधिका-याने तांत्रिक मान्यता देतांना संदर्भीय शासन परिपत्रक दि.२०/१०/२०१० (संदर्भ क्र. ३) प्रमाणे कार्यपध्दती अवलंबिण्यात आलेली आहे व त्याबाबत अंदाजपत्रकातील सर्वसाधारण टिपणीत स्पष्ट उल्लेख नमूद केल्याची याची खात्री करुनच तांत्रिक मान्यता दयावी. याबाबतची खात्री करण्याची संपूर्ण जबाबदारी अंदाजपत्रकांस तांत्रिक मान्यता देणा-या अधिका-यांची राहिल. यात निष्काळजीपणा झाल्यास संभाव्य अतिप्रदानाची जबाबदारी संबंधितांवर राहिल. संदर्भित परिपत्रकातील अन्य निर्देशांमध्ये वहन अंतराव्यतिरिक्त कोणताही बदल करण्यात येत नाही.

हे आदेश या आदेशाच्या दिनांकापासून अमलात येतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०११७१७३००२८७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Ram Baswantrao Ghote

Digitally signed by Ram Baswantrao Ghote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ram Baswantrao Ghote
Date: 2015.01.17 17:38:50 +05'30'

(रा.ब. घोटे)
शासनाचे मुख्य अभियंता व सहसचिव

**प्रत,**

१) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२) मा. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) मा. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) मा. प्रधान सचिव,( जलसंपदा) मंत्रालय, मुंबई.
५) मा. प्रधान सचिव,( लाक्षेवि) मंत्रालय, मुंबई.
६) सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
७) सर्व महासंचालक, जलसंपदा विभाग.
८) सर्व मुख्य अभियंता जलसंपदा विभाग.
९) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१०) आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११) सर्व तांत्रिक अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.